दै. महाराष्ट्र टाईम्स
गुरूवार दि. ३१ मे २०१८



# सरखेल कान्होजी आंग्रे

परंपरा आरमाराची भाग ७

अनिकेत यादव

बालमित्रांनो,

छत्रपती शिवाजी महाराजांनी कोणत्या परिस्थितीत आरमाराची उभारणी केली, हे आपण मागील भागात पाहिले. मात्र, आरमाराची उभारणी म्हणजे म्हणजे केवळ जहाजबांधणी करून शिवाजी महाराज थांबले नाहीत, तर त्यांनी त्याला शास्त्रीय ज्ञानाची जोड दिली. धार्मिक चालीरीती झुगारून देऊन आरमार सांभाळणाऱ्या आपल्या मावळ्यांना लढण्याची नवी उमेद दिली. समुद्री लढाईची कोणतीही माहिती नसणाऱ्या आपल्या दर्यावर्दी लोकांना त्यांनी सतत प्रेरणा दिली. लुटींमधून मिळणारा बराचसा पैसा समुद्री किल्ले, आरमार, जहाजबांधणी, शस्त्रास्त्र निर्मितीसाठी खर्च केला. खांदेरी, कुलाबा, पद्मदुर्ग, सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग अशा जलदुर्गांची रांगच पश्चिम किनाऱ्यावर त्यांनी उभी केली. त्यामुळे शिवाजी महाराजांनंतर असामान्य ताकद व दुर्दम्य इच्छाशक्ती असणारी आरमारी तरुण पिढी पुढे आली आणि तिने जोमदार इतिहास निर्माण केला. औरंगजेबाने दक्षिणेत येऊन भूप्रदेश जिंकून घेतला, तरी त्याच्याकडे प्रबळ आरमार नसल्यामुळे समुद्रावर अखेरपर्यंत मराठ्यांचीच सत्ता राहिली. त्याच तरुण पिढीने सागरावरील मराठ्यांची सत्ता व प्रतिष्ठा वाढविली.

शिवाजी महाराजांच्या निधनानंतर छत्रपती संभाजी महाराजांनीदेखील आपल्या अल्प कारकिर्दीत जमिनीवर व समुद्रातही मराठ्यांची पताका डौलाने फडकवत ठेवली. जंजिरा जिंकण्यासाठी छत्रपती संभाजी महाराज समुद्रात भर घालत आहेत, हे पाहून तर सिद्दी पुरताच घाबरला होता. ही कोणालाही न सुचणारी व अशक्य वाटणारी बाब संभाजी महाराज करीत होते, ही साधीसुधी गोष्ट नाही. तसेच संभाजी महाराजांची गोव्यावरील मोहीम, खांदेरीची मोहीम; तसेच मुंबईवर हल्ला करण्याची योजना आरमारीदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे. संभाजी महाराजांनंतर मराठा आरमार कान्होजी आंग्रे यांनी समर्थपणे सांभाळले. या कान्होजींनी पोर्तुगीज-इंग्रजांची हिंदी महासागरावरील सत्ता खिळखिळी करून टाकली.

कान्होजींचे वडील तुकोजी हे शहाजीराजांच्या चौल येथील मोहिमेत सहभागी होते; तसेच ते शिवाजी महाराजांच्याही सैन्यात होते. कान्होजींचे आजोबा सेखोजी यांनी सुवर्णदुर्गाच्या तटबंदीचे काम पाहिले. कान्होजींनी शिवाजी महाराजांची कडक शिस्त अवलंबिली होती. त्यामुळे कान्होजी आंग्रे यांनी आरमारामध्ये आपल्या स्वपराक्रमानं खूप मोठी कीर्ती संपादित केली. जंजिऱ्याच्या सिद्दीने जिंकलेला मराठ्यांचा जमिनीवरील प्रदेशदेखील त्यांनी स्वराज्यात आणला. त्यामुळे राजाराम महाराजांनी त्यांना आरमाराचे सुभेदार नेमून 'सरखेल' हा किताब दिला. पुढे जवळजवळ ४० वर्षे मराठा आरमार कान्होजी आंग्रे यांच्या नेतृत्वाखाली सतत काम करीत होते. मराठी व्यापाऱ्यांचे लूटमारीपासून संरक्षण करणे; तसेच समुद्रावर मराठा सत्ता निर्माण करणे ही गोष्ट सोपी नव्हती. पोर्तुगीज, इंग्रज, डच, सिद्दी, कोकणातील सावंत या सर्वांशी लढा द्यायचा होता. पूर्वी समुद्रावर संचार करणाऱ्या जहाजांना पोर्तुगीज-इंग्रज यांचे परवाने घ्यावे लागायचे. मराठ्यांच्या सामुद्री दहशतीमुळे ही परिस्थिती बदलली. आता पोर्तुगीज-इंग्रजांसह सर्व व्यापाऱ्यांना, मराठा आरमाराकडून 'परवानापत्र' (दस्तक) विकत घेण्याची सक्ती करण्यात आली. जे युरोपीयन हिंदी महासागराला स्वतःच्या मालकीचा समजायचे, त्यांना कान्होजी आंग्रे यांच्या नेतृत्वाखालील मराठा आरमारानं धडा शिकवला.

